**राज्य शासकीय कर्मचारी व अन्य पात्र कर्मचारी यांना तीन लाभांची सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबतच्या, राज्य वेतन सुधारणा समितीच्या शिफारशी स्विकृतीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: वेतन-१११९/प्र.क्र. ३/सेवा-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०१ जानेवारी, २०१९

**<u>प्रस्तावना</u>:-**

केंद्र शासनाने, केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांबाबतचा, सातवा वेतन आयोगाचा अहवाल स्विकारुन, सदर कर्मचाऱ्यांच्या वेतन संरचना दिनांक १ जानेवारी, २०१६ पासून सुधारणा करण्याचा निर्णय घेतला आहे. सदर अहवालामध्ये जुन्या सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेमध्ये फेरफार करुन नवीन सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांना लागू करण्याची, सातव्या केंद्र वेतन आयोगाची शिफारस देखील, केंद्र शासनाने स्विकारलेली आहे.

केंद्र शासनाने, केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांना लागू केलेल्या सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेच्या धर्तीवर राज्य शासकीय व इतर पात्र कर्मचाऱ्यांच्या सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेत सुधारणा करण्याच्या दृष्टीने शिफारशी करण्यासाठी शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक वेपुर-१२१६/प्र.क्र.५८/सेवा-९, दि.१७ जानेवारी, २०१७ अन्वये श्री. के. पी. बक्षी, राज्य शासनाचे सेवानिवृत्त अप्पर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग व प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग अशा अन्य दोन सदस्यांचा समावेश असलेली, त्रिसदस्यीय राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ ची स्थापना करण्यात आली होती. केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगानुसार लागू केलेल्या सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा आधार घेऊन तथापि त्यात उचित फेरफार करुन, राज्य वेतन सुधारणा समिती-२०१७ यांनी, सातव्या वेतन आयोगाच्या अहवालाचा खंड - १ दिनांक ५ डिसेंबर, २०१८ रोजी शासनास सादर केला आहे. सदर अहवालातील, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना लागू करण्याबाबत केलेल्या शिफारशीं, स्वीकृत करण्याबाबतचा प्रस्ताव, शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना, राज्य शासकीय कर्मचाऱ्यांना लागू करण्याबाबतच्या राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ ने त्यांच्या अहवाल खंड - १ मध्ये केलेल्या शिफारशी, उचित फेरफारासह, स्वीकारण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्याबाबबतचा तपशिल सोबतच्या विवरणपत्रात नमूद करण्यात आला आहे. वरीलप्रमाणे सदरहू शिफारशी स्वीकृत केल्याच्या परिणामी, ज्याठिकाणी सविस्तर आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता आहे, त्याबाबत स्वतंत्रपणे कार्यवाही करण्यात येईल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून तिचा संकेतांक २०१९०१०११७१९४९२५०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Nitin R. Gadre
Date: 2019.01.01 17:26:10 +05'30'

**( नितीन गद्रे )**
प्रधान सचिव, (ले. व को.) वित्त विभाग

**प्रति,**

| | |
|---|---|
| राज्यपालांचे सचिव<br>मुख्यमंत्री यांचे सचिव<br>सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव<br>मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद / विधान सभा, महाराष्ट्र<br>विधानमंडळ सचिवालय, मुंबई<br>सर्व सन्माननीय विधानसभा, विधान परिषद व संसद सदस्य<br>मंत्रालयीन सर्व विभाग<br>सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव मंत्रालय, मुंबई<br>सचिव, मा.सभापती, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई<br>सचिव, मा.अध्यक्ष, विधान सभा, विधानमंडळ, मुंबई<br>मंत्रालयीन सर्व विभागाच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख<br># प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा),मुंबई.<br># प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा),मुंबई.<br>#सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.<br># सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.<br>#प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई.<br># आयुक्त राज्य माहिती आयोग,(सर्व)<br># सचिव राज्य निवडणूक आयोग,मुंबई.<br># प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/ औरंगाबाद.<br>सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.<br>सर्व विभागीय आयुक्त.<br>सर्व जिल्हाधिकारी<br>सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.<br>महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.<br>महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई<br>महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर<br>महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर<br>संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई | निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई<br>सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,<br>लेखा अधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/नागपूर/पुणे/औरंगाबाद.<br>मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका<br>कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी /देहू रोड/ देवळाली/ अहमदनगर.<br>कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर<br>कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी<br>कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ,अकोला<br>कुलसचिव, कोकण कृषि विद्यापीठ,दापोली, जिल्हा रत्नागिरी.<br>कुलसचिव,मुंबई विद्यापीठ,नागपूर.<br>कुलसचिव,पुणे विद्यापीठ, पुणे.<br>कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर.<br>कुलसचिव,डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.<br>कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ,नांदेड.<br>कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.<br>कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती.<br>कुलसचिव,श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यारपीठ,मुंबई.<br>कुलसचिव,उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ,जळगाव.<br>कुलसचिव, कवी कुलगुरू कालिदास विद्यापीठ संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, जि.नागपूर.<br>वित्त विभागातील सर्व कार्यासने<br>निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-३) |

| | |
|---|---|
| अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई<br>मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब,मुंबई<br>उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब,मुंबई/पुणे/ नागपूर /औंरगाबाद/ नाशिक /अमरावती.<br>जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर,<br>जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी हिशेब,कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी,<br><br># पत्राने | |

( शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन-१११९ / प्र.क्र. ३ / सेवा- ३
दिनांक ०१ जानेवारी, २०१९ सोबतचे विवरणपत्र )

**विवरणपत्र**

**राज्य वेतन सुधारणा समिती, २०१७ च्या अहवालातील शिफारशी व त्यावर शासनाने घेतलेले**

| अ. क्र. | अहवालातील शिफारशींचे परिच्छेद क्रमांक | शिफारशीचा गोषवारा | शिफारशींवर शासनाने घेतलेला निर्णय |
|---|---|---|---|
| १ | ५.४, ५.४.१, ५.४.२, ५.४.३, ५.४.४, ५.४.५, ५.४.६, ५.५, ५.५.१, ५.५.२, ५.५.४, ५.५.७, ५.५.८ | विविध संवर्गाच्या संघटनांनी केलेल्या मागण्यांचा साकल्याने विचार करुन राज्य शासकीय कर्मचारी तसेच जिल्हा परिषदेचे शिक्षकेतर कर्मचारी, १००% अनुदानित संस्था, स्वायत्त संस्था, कृषि विद्यापीठे, बिगर कृषी विद्यापीठे, अनुदानित संस्थांमधील शिक्षकेतर कर्मचारी यांना सातव्या वेतन आयोगाच्या कालावधीत केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांना लागू केलेल्या सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती (Modified Assured Career Progression Scheme) योजनेमध्ये आवश्यक तो फेरफार करुन ही योजना पुढीलप्रमाणे कार्यान्वित करण्यात यावी, अशी शिफारस ही समिती करीत आहे.<br>सहाव्या वेतन आयोगानुसार रु. ५४०० ग्रेड पे पर्यंतच्या मॅट्रीक्समध्ये वेतन आहारीत करणाऱ्या राज्य शासकीय कर्मचारी / अधिकारी यांना त्यांच्या संपूर्ण सेवा कालावधीत १०, २० व ३० वर्षांच्या नियमित सेवेनंतर एकूण ३ लाभांची सुधारीत सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजना, लागू करण्यात यावी. | स्वायत्त संस्था सोडून इतर कर्मचाऱ्यांकरीता केलेल्या शिफारशी स्वीकारण्यात येत आहेत. |

| अ. क्र. | अहवालातील शिफारशींचे परिच्छेद क्रमांक | शिफारशीचा गोषवारा | शिफारशींवर शासनाने घेतलेला निर्णय |
|---|---|---|---|
| २ | ५.४.७ | या योजनेअंतर्गत लाभ अनुज्ञेयतेसाठी गोपनीय अहवाल प्रतवारीचा निकष हा ब+ असा राहील. तथापि वर्ग-४ मधील कर्मचारी तसेच मागासवर्गीय कर्मचारी यांच्या पदोन्नतीकरीता सामान्य प्रशासन विभागाने विहीत केलेले आदेश तसेच धोरण विचारात घेऊन त्यांची या योजनेअंतर्गत लाभासाठी पात्रता तपासण्यात येईल. | या योजनेअंतर्गत लाभ अनुज्ञेयतेसाठी गोपनीय अहवाल प्रतवारीच्या सरासरीचा निकष हा निकटच्या पदोन्नतीच्या पदासाठी सामान्य प्रशासन विभागाने विहीत केल्यानुसार राहील, या बदलासह स्वीकृत. |
| ३ | ५.५.३ | पदोन्नतीची साखळी असलेल्या पदावर कार्यरत कर्मचारी / अधिकारी यांना दि.१.१.२०१६ रोजी पासून दि.३१.१२.२०१८ पर्यंतच्या कालावधीत लाभ अनुज्ञेय झाल्यास त्यांना सदर लाभ पुढील प्रमाणे मंजूर होईल.<br>वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० पर्यंतच्या कमाल वेतन मर्यादेपर्यंत वेतन आहरीत करणाऱ्या अधिकारी/ कर्मचारी यांना या नवीन योजने अंतर्गत ७ व्या वेतन आयोगाच्या वेतन मॅट्रीक्समध्ये पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीत यथास्थिती पहिला वा दुसरा वा तिसरा लाभ अनुज्ञेय ठरेल. याचाच अर्थ संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना पे मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-२० मध्ये वेतन आहरीत करेपर्यंतचा, यथास्थिती पहिला वा दुसरा वा तिसरा लाभ घेतल्यामुळे संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी वेतनस्तर एस-२० ओलांडला कि, त्यास तद्नंतर त्यापुढील लाभ अनुज्ञेय राहणार नाही / नाहीत. | स्वीकृत.<br>वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस-२० या कमाल वेतन स्तरामध्ये वेतन आहरीत करेपर्यंतच लगतच्या शिफारशीनुसार लाभ संबंधितास अनुज्ञेय राहील. एकदा का संबंधित अधिकारी / कर्मचारी यांस एस-२१ हा वेतन स्तर लागू झाला की त्यास त्यापुढचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही. |

| अ. क्र. | अहवालातील शिफारशींचे परिच्छेद क्रमांक | शिफारशीचा गोषवारा | शिफारशींवर शासनाने घेतलेला निर्णय |
|---|---|---|---|
| ४ | ५.५.५ | मंत्रालयातील लिपिक टंकलेखक या संवर्गास ७ व्या वेतन आयोगात सुधारित वेतनश्रेणीतील शिफारस केल्याच्या परिणामी त्यांच्याकरीता आश्वासित प्रगती योजनेच्या अनुषंगाने समितीने प्रकरण ४ च्या परिच्छेद ४.७ मध्ये शिफारस केली आहे. | मंत्रालयातील लिपिक टंकलेखकांना राज्यातील इतर ठिकाणांच्या लिपिक टंकलेखकांपेक्षा वेगळी वेतनश्रेणी द्यावी, ह्या समितीच्या शिफारशीवर स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येणार असल्यामुळे, समितीच्या ह्या शिफारशींच्या अनुषंगाने देखील नंतरच निर्णय घेण्यात येईल. |
| ५ | ५.५.६ | अगोदरच शासन सेवेत कार्यरत असताना दि. १.१.२०१९ नंतर लाभ अनुज्ञेय ठरणाऱ्या, पदोन्नतीच्या साखळीतील पदावर कार्यरत कर्मचारी / अधिकारी यांना दि.१.१.२०१९ रोजी व नंतरच्या कालावधीत नवीन योजनेच्या लाभाची अनुज्ञेयता वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर एस-२० पर्यंतच्या कमाल वेतन मर्यादेपर्यंत वेतन आहरीत करणाऱ्या अधिकारी / कर्मचारी यांना या नवीन योजने अंतर्गत ७ व्या वेतन आयोगाच्या वेतन मॅट्रीक्समध्ये पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीत यथास्थिती पहिला वा दुसरा वा तिसरा लाभ अनुज्ञेय राहील. याचाच अर्थ संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना पे मॅट्रीक्समधील वेतन स्तर-२० मध्ये वेतन आहरीत करेपर्यंतच, यथास्थिती पहिला वा दुसरा वा तिसरा लाभ अनुज्ञेय ठरेल. पहिला वा दुसरा वा तिसरा लाभ घेतल्यामुळे संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी वेतनस्तर एस-२० ओलांडला कि, त्यास तदनंतर त्यापुढील लाभ अनुज्ञेय राहणार नाही / नाहीत. | स्वीकृत.<br>याचाच अर्थ त्यास यथास्थिती पहिला वा दुसरा वा तिसरा लाभ हा वेतन मॅट्रीक्स मधील वेतन स्तर एस-२० या कमाल वेतन स्तरामध्ये वेतन आहरीत करेपर्यंतच अनुज्ञेय राहील. एकदा का संबंधित अधिकारी / कर्मचारी यांस वेतन स्तर एस-२१ लागू झाला की त्यास त्यापुढचा लाभ अनुज्ञेय राहणार नाही. |